नाशिक जिल्ह्यातील सटाणा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१७४/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०२ जानेवारी, २०२०.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.का-५/साबांप्राविना/प्रआ/रस्ते दर्जोन्नत/ता. सटाणा जि. नाशिक/७३५०/२०१८, दि. ०३/१२/२०१८.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये नाशिक जिल्ह्यातील सटाणा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेऊन नाशिक जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | राज्यमार्ग-२० पासून उत्राणे - तळवाडे भामेर - बिलपुरी - बोढरी - चिराई प्रमुख राज्यमार्ग-८ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०३ | (०/०० ते १६/५००) १६.५०० कि.मी. | १६.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४२ |
| २. | राष्ट्रीय महामार्ग-७५२ जी पासून सटाणा - चौगांव - कऱ्हे - रातीर जुने - रातीर नवे - वायगांव राज्यमार्ग- २० ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०६ | (०/०० ते २०/३५०) २०.३५० कि.मी. | २०.३५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४३ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३. | राज्यमार्ग-१९ (चौंधाणे) पासून - नवे निरपूर - खमताने - सटाणा राज्यमार्ग-१९ पर्यंत रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०८ | (०/०० ते १०/००) १०.०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४४ |
| ४. | राज्यमार्ग- १९ पासून मळगांव बु. - गणोरे - मोकभणगी - ककाणे - विसापूर - खामखेडा - सावकी - ठेंगोडा - आराई - शेमळी ते राज्यमार्ग-१९ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०९ | (०/०० ते ३८/३५०) ३८.३५० कि.मी. | ३८.३५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४५ |
| ५. | राज्यमार्ग-०७ पासून (ढोलबारे) - पारनेर - निताणे - लाडुद - सोमपूर - तांदुळवाडी - नांदीन ते धुळे जिल्हा हद्दीला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १६ | (०/०० ते २१/००) २१.०० कि.मी. | २१.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४६ |
| ६. | प्रस्तावित प्रमुख जिल्हा मार्ग पासून रातीर जुने इ-६ पासून कुपखेडा - खिरमणी - फोफीर - आसखेडा - वाघळे - श्रीपूरवडे - टिंगरी ते धुळे जिल्हा हद्दीला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ५६ | (०/०० ते २९/९००) २९.९०० कि.मी. | २९.९०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४७ |
| ७. | राष्ट्रीय महामार्ग-७५२ जी चिंचबारी पासून - निताणे - जायखेडा - एकलहरे - वाडीपिसोळ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ९६ | (०/०० ते १३/००) १३.०० कि.मी. | १३.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४८ |
| ८. | सटाणा (राज्यमार्ग-७) ते द-हाणे- पिंपळदर - नवेगांव - तिळवण - सरवर - दहिंदुले - जोरण ते प्रमुख जिल्हा मार्ग-३ ला जोडणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ९७ | (०/०० ते १३/५००) १३.५०० कि.मी. | १३.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१४९ |
| ९. | प्रमुख राज्यमार्ग-०८ ते इजमाने - मळगांव भामेर - पोहाणे ते प्रमुख जिल्हा मार्ग-९५ ला जोडणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १०३ | (०/०० ते १४/००) १४.०० कि.मी. | १४.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१५० |
| १०. | राज्यमार्ग -३३ पासून अजमेर सौंदाणे - चौगांव - भाक्षी - भडारपाडा - आव्हाटी ते राष्ट्रीय महामार्ग-७५२ जी ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १०४ | (०/०० ते १७/६००) १७.६०० कि.मी. | १७.६०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१५१ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ११. | राज्यमार्ग-३३ ते देवळाणे - रातीर नवे - सारदे - अंबासन ते प्रमुख राज्यमार्ग-८ ला मिळणारा रस्ता | इतर जिल्हा मार्ग १०५ | (०/०० ते १३/२५०) १३.२५० कि.मी. | १३.२५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१५२ |
| १२. | राज्यमार्ग -२० पासून सोमपूर - भडाणे - पिंपळकोठा - दसवेल - तुंगनदिगार रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १०६ | (०/०० ते १०/२५०) १०.२५० कि.मी. | १०.२५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१५३ |
| १३. | साल्हेर (राज्यमार्ग-२१ पासून) पायरपाडा - भिकारसोडा - सावरपाडा - बारीपाडा - वाठोदा - केळझर ते प्रमुख जिल्हा मार्ग-४७ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १०७ | (०/०० ते १५/००) १५.०० कि.मी. | १५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१५४ |
| | **एकूण** | | | **२३२.७०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील नाशिक जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **२३२.७०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (३४६३.८१०+ २३२.७००) म्हणजेच **३६९६.५१० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **२३२.७०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (२५९१.७८० - २३२.७००) म्हणजेच **२३५९.०८० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०२१५०४०५३९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.01.02 15:09:34 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव(नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,नाशिक.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.